**माहितीचा अधिकार अधिनियमाच्या प्रभावी अंमलबजावणी संदर्भात ऑगस्ट २००९ च्या अंतिम सप्ताहात विशेष मोहिम राबविणेबाबत**

**महाराष्ट्र शासन,**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन आदेश क्रमांक -केंमाअ-२००९/६३१ /प्र.क्र. २६७/०९/सहा.
दिनांक - २४ जुलै, २००९

**प्रस्तावना :-**

माहितीचा अधिकार अधिनिमय २००५ हा कायदा दिनांक १२/१०/२००५ पासून अंमलात आला आहे. या अधिनियमातील कलम ४ (१) (क) मधील तरतुदीप्रमाणे प्रत्येक सार्वजनिक प्राधिकरणांने सर्व अभिलेख योग्य रीतीने सूचीबध्द करुन त्याची निर्देश सूची तयार करणे व संगणकीकरण करणे शक्य असेल अशा अभिलेखांचे वाजवी कालावधीत व साधन संपत्तीच्या उपलब्धतेनुसार संगणकीकरण करणे व ही माहिती नेटवर्कवर उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. कलम ४ (१) (ख) मधील तरतुदीनुसार हा अधिनियम अधिनियमीत झाल्यापासून १२० दिवसांच्या आत १७ बाबींवरील माहिती तयार करुन ती प्रसिध्द करणे आवश्यक होते. तसेच सदर माहिती वेळोवेळी अद्ययावतही करणे आवश्यक आहे. कलम ५ (१) व ५ (२) मधील तरतुदी पहाता सार्वजनिक प्राधिकरणांनी आवश्यक असतील तेवढया जास्तीत जास्त अधिकाऱ्यांना राज्य जन माहिती अधिकारी व प्रथम अपिलीय प्राधिकारी म्हणून निर्देशित करणे आवश्यक आहे. शासनाने या कार्यवाहीबाबत वेळोवेळी सूचना निर्गमित केलेल्या आहेत. या उपरांत जनतेकडून या संदर्भात तक्रारी प्राप्त होत आहेत. दैनंदिन कामकाजाच्या व्यापामुळे अभिलेख सूचीबध्द करणे व त्यांची निर्देशसूची तयार करणे इ. कामे सार्वजनिक प्राधिकरणांनी पूर्ण न केल्याने माहिती पुरविण्यात विलंब होतो असे निदर्शनास आले आहे.

अभिलेख सूचीबध्द करणे व त्यांची निर्देशसूची तयार करणे या बाबींचे दीर्घकालीन महत्व विचारात घेता या कामासाठी विशेष मोहिम राबवून ते प्राथम्याने पूर्ण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढील आदेश देत आहे.

**आदेश :-**

(१) सर्व सार्वजनिक प्राधिकरणांनी ऑगस्ट २००९ मधील अंतिम सप्ताह हा अभिलेख सूचीबध्द करणे व त्यांची निर्देशसूची तयार करणे ही कामे या विशेष मोहिमे अंतर्गत प्राथम्याने हाती घ्यावीत. कार्यालयातील सर्व अभिलेखांची निंदणी, वर्गवारी करुन ते सर्व सूचीबध्द करण्यात यावेत व त्यांच्या निर्देशसूच्या तयार करण्यात याव्यात. तातडीच्या व अत्यावश्यक दैनंदिन बाबींकडे या मोहीमेमुळे दुर्लक्ष होणार नाही याचीही दक्षता सर्व सार्वजनिक प्राधिकरणांनी घेणे आवश्यक आहे.

(२) ज्या सार्वजनिक प्राधिकरणांनी अद्याप कलम ४ च्या तरतुदींना अपेक्षित १७ बाबींवरील माहिती तयार करुन जनतेकरीता उपलब्ध केलेली नाही व शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द केलेली नाही तसेच सहायक जन माहिती अधिकारी, जन माहिती अधिकारी व अपिलीय प्राधिकाऱ्यांना निर्देशित करुन त्यांचे फलक दर्शनी ठिकाणी लावले नाहीत अशा सार्वजनिक प्राधिकरणांनी कोणत्याही परिस्थितीत दिनांक ३१/८/२००९ पर्यंत अशी कार्यवाही पूर्ण करावी. दिनांक ३१/८/२००९ नंतर याबाबत जनतेकडून तक्रार प्राप्त झाल्यास संबंधितांविरुध्द कठोर कार्यवाही करण्याची व संबंधित कार्यालय प्रमुखांच्या गोपनीय अहवालात तशी नोंद घेण्याची कार्यवाही सक्षम प्राधिकाऱ्यांनी तात्काळ करावी.

(३) जिल्हयातील सर्व सार्वजनिक प्राधिकरणांनी माहिती अधिकारी / प्रथम अपिलीय प्राधिकाऱ्यांचे फलक दर्शनी ठिकाणी प्रदर्शित करणे, १७ बाबींची माहिती तयार करुन त्यास प्रसिध्दी देणे या कामांकरीता नेमलेल्या संनियंत्रण अधिकाऱ्यांचे अहवाल शासनाकडे प्राप्त झालेले नाहीत. त्यामुळे सर्व जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या जिल्हयांचे १०० टक्के अनुपालनासंदर्भातील संकलित अहवाल दिनांक ३१/८/२००९ पूर्वी शासनास पाठवावेत. अहवाल पाठवितांना जिल्हयातील सर्व सार्वजनिक प्राधिकरणांची यादी व त्यांच्या कार्यपूर्ततेबाबतची नोंद त्यात असणे आवश्यक राहील.

(४) या शासन निर्णयाच्या अनुषंगाने करण्यात आलेल्या कार्यवाहीचा आढावा सर्व सार्वजनिक प्राधिकरणांनी त्यांच्या प्रशासकीय विभागांना सादर करावा व प्रशासकीय विभागांनी सामान्य प्रशासन विभागाकडे तो कोणत्याही परिस्थितीत दिनांक १५/०९/२००९ पूर्वी सादर करावा.

हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर संगणक सांकेतांक क्रमांक २००९०७२४२००८५६००१ वर प्रसिध्द करण्यात आलेले आहेत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

टी. एफ. थेकेकरा

**(टी. एफ्. थेकेकरा )**
**शासनाच्या प्रधान सचिव**

**प्रत :-**

मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
मा. मुख्यमंत्री /मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/सचिव
सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
राज्य मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
राज्य माहिती आयुक्त, बृहन्मुंबई शहर/कोकण विभाग/पुणे विभाग/औरंगाबाद विभाग/नागपूर विभाग/अमरावती विभाग

- प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
- प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
- सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
- सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई

मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
शासनाच्या नियंत्रणाखालील सर्व मंडळे / महामंडळे व शासनाचे सर्व सार्वजनिक उपक्रम
सर्व महानगरपालिका / नगरपालिका / नगर परिषदा
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती, सा.प्र.वि., कार्यासन क्र. ६.

- पत्राने